**संबोधी अकादमी महाराष्ट्र संचलित संबोधी स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद यांचा राज्य सेवा परिक्षा पूर्व प्रशिक्षण कार्यक्रम डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे मार्फत ५ वर्ष चालू ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बारटी-२०१९/प्र.क्र.२२३/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

१) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांचे No.BARTI/AUTONOMY/२००८-०९/३०, दि.२.६.२००८ चे पत्र.

२) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांचे पत्र जा.क्र.बार्टी,पुणे/स्प.प.पू.प्र./MPSC/२०२१-२२/४६५५ दि. १४.१०.२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

संबोधी अकादमी महाराष्ट्र संचलित, संबोधी स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण केंद्र, जि.औरंगाबाद यांचा राज्य सेवा परिक्षा पूर्व प्रशिक्षण कार्यक्रम डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे मार्फत ५ वर्षे चालू ठेवणे बाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

संबोधी अकादमी महाराष्ट्र संचलित संबोधी स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण केंद्र, जि. औरंगाबाद यांचा राज्य सेवा परिक्षा पूर्व प्रशिक्षण कार्यक्रम डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे मार्फत ५ वर्षे चालू ठेवणे याबाबतच्या प्रस्तावास खालीलप्रमाणे याव्दारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर केंद्रास प्रति वर्षी एकूण २०० विद्यार्थी या प्रमाणे ५ वर्षाकरीता प्रशिक्षणासाठी मान्यता प्रदान करण्यात येत आहे.
२. त्याचबरोबर विद्यार्थ्यांची मागणी लक्षात घेता शैक्षणिक साहित्यासाठी रु.१५,०००/- ऐवजी रु. २५,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस हजार फक्त) व १० महिने ऐवजी १२ महिन्याच्या कालावधीची बॅच करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार शैक्षणिक साहित्य खरेदी करीता रु. १५,०००/ ऐवजी रु. २५,०००/- व १० महिने ऐवजी १२ महिन्यांची बॅच अशा प्रकारे २०० विद्यार्थ्यांचा ५ वर्षासाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे अपेक्षित असून त्यास येणारा संभाव्य अपेक्षित खर्च पुढील प्रमाणे आहे.

एका प्रशिक्षण केंद्रास बारा महिने कालावधीकरीता २०० विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमास येणाऱ्या संभाव्य खर्चाचा तपशील,

तक्ता अ

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | एकूण विद्यार्थ्यांची संख्या (१०० विद्यार्थ्यांची एक बॅच याप्रमाणे दोन बॅच) | प्रति माह खर्चाची रक्कम रू. | बारा महिने कालावधी करीता प्रति विद्यार्थी एकूण रक्कम रू. | बारा महिने कालावधी करीता एकूण २०० विद्यार्थ्यांसाठी रक्कम रू. | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षण शुल्क | २०० | --- | १,०८,०००/- | २०० (वि.) X १,०८,०००/- | २,१६,००,००० |
| २ | विद्यावेतन | | ९०००/- | १,०८,०००/- | २०० (वि.) X १,०८,०००/- | २,१६,००,००० |
| ३ | पुस्तक संच खर्च | | --- | २५,०००/- | २०० (वि.) X २५,०००/- | ५०,००,०००/- |
| | **एकूण (अक्षरी रूपये चार कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त)** | | | | | **४,८२,००,०००/-** |

तक्यात दर्शविल्याप्रमाणे २०० विद्यार्थ्यांचा बारा महिनेकरीता एकूण रक्कम रू.४,८२,००,०००/- (अक्षरी रूपये चार कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त) इतका संभाव्य खर्च अपेक्षित आहे.

५ वर्षामध्ये एकूण १००० विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देणेसाठी अपेक्षित खर्च पुढीलप्रमाणे:

तक्ता ब

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | एकूण विद्यार्थ्यांची संख्या (२०० विद्यार्थी प्रति वर्षी याप्रमाणे) | प्रति माह खर्चाची रक्कम रू. | एक वर्षाकरीता २०० विद्यार्थ्यासाठी एकूण रक्कम रू. | ५ वर्ष कालावधी करीता एकूण १००० विद्यार्थ्यांसाठी रक्कम रू. |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षण शुल्क | १००० | --- | २,१६,००,०००/- | १०,८०,००,०००/- |
| २ | विद्यावेतन | | ९०००/- | २,१६,००,०००/- | १०,८०,००,०००/- |
| ३ | पुस्तक संच खर्च | | --- | ५०,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| | **एकूण (अक्षरी रूपये चोविस कोटी दहा लक्ष फक्त)** | | | | **२४,१०,००,०००/-** |

वरील प्रमाणे संबोधी अकादमी, औरंगाबाद येथे १००० विद्यार्थ्यांच्या ५ वर्षे प्रशिक्षण कालावधीसाठी मान्यता दिल्यास एकूण रक्कम रुपये रू. २४,१०,००,०००/- (अक्षरी रक्कम रुपये चोवीस कोटी दहा लाख फक्त) इतका संभाव्य खर्च अपेक्षित आहे.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. आनप्रस-२००५/प्र.क्र.३८३/ मावक-२, दि.३०.०४.२००८ अन्वये, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे ही संस्था स्वायत्त करण्याच्या उद्देशाने, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेच्या धर्तीवर बार्टीची स्थापना करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, सदर संस्था सार्वजनिक विश्वस्त संस्था नोंदणी, १९५० अंतर्गत नोंदणीकृत करण्यात आली. त्यामुळे Memorandum of Association च्या तरतुदीनुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेस स्वायत्तता दिल्यापासून सर्व कार्ये नियामक मंडळाच्या मान्यतेने होत असतात. तथापि, संस्थेच्या Memorandum of Association मध्ये बार्टीच्या Rules and Regulations मधील अ.क्र.५७ येथे पुढीलप्रमाणे नमूद केले आहे. “The Government shall have the right to issue any general or specific directives on any matters of policy concerning the affairs of the society and such directives shall be binding on the society”. त्यास अनुसरून संबोधी अकादमी संचलित, संबोधी स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण केंद्र ,जि. औरंगाबाद येथील केंद्रास प्रतिवर्षी २०० विद्यार्थी या प्रमाणे एकूण १००० विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देण्यास पुढील ५ वर्षापर्यंत उपरोक्त प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११०२८१३२८३१३६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.28 13:32:02 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (सा.न्या.) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
३) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखाधिकारी,मुंबई
६) निवडनस्ती (बांधकामे).